**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत...**
**(लेखाशिर्ष २२२५एफ१०२)**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४ / प्र.क्र.०२/ कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०७ ऑगस्ट,२०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४ व क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.
२) प्राचार्य, सैनिकी स्कूल, सातारा यांचे दि.११.०७.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता या योजनेतून सातारा सैनिकी स्कूल येथे शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमाती प्रवर्गातील जुन्या ३ विद्यार्थ्यांसाठी व नवीन ३ विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीसाठी एकूण रु.९.१०७६७ लाख इतक्या निधीची मागणी संदर्भाधीन क्र.२ अन्वये केली आहे. केल्याबाबत नमूद केले आहे.

त्यास अनुसरुन वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता या योजनेतून रु.९.१०७६७ लाख इतका निधी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण

याखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता योजनेसाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर पुढीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पीत तरतूद** | **या शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता | २२२५एफ १०२ | ३४-शिष्यवृत्या / विद्यावेतने | ५०.०० | ९.१०७६७ |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.९.१०७६७ लाख (अक्षरी रुपये नऊ लाख दहा हजार सातशे सदुसष्ट फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत व प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०८०७१०२६४७५०२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.08.07 12:16:42 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे
८. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र.१२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.